केंद्र पुरस्कृत सिल्क समग्र (ISDSI) योजनेंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थ्यांकरिता निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : केंपुयो-१०२०/प्र.क्र.४१/रेशीम कक्ष**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३० मार्च, २०२२.

वाचा :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. प्राविया-१०१८/प्र.क्र.९०/रेशीम कक्ष, दिनांक २४ मे, २०१९.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. प्राविया-१०१८/प्र.क्र. ९०/रेशीम कक्ष, दिनांक १४ जानेवारी, २०२१.
३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. केपूयो-१०२०/प्र.क्र. ४१/रेशीम कक्ष, दिनांक २२ मार्च, २०२१.
४) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्र. रे/कार्या-९/केंपुयो/सिल्क समग्र/सर्वसाधारण प्रवर्ग/ २०-२१/४८८, दिनांक ३१ मार्च, २०२१.
५) केंद्रीय रेशीम मंडळाचे पत्र क्र. CSB-37/1/Silk Samagra/Gen. Corres/2020-21/TS, दिनांक ०९ एप्रिल, २०२१.
६) केंद्रीय रेशीम मंडळाचे पत्र क्र. CSB-37/1/CSS(Silk Samagra) Maharashtra/ 2018-19/Vol-l, दिनांक १४ जुलै, २०२१.
७) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्र. रे/कार्या-९/केंपुयो/प्र.मा./निधी मागणी/२१/२२/९३५, दिनांक २७ जुलै, २०२१.
८) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०३ फेब्रुवारी, २०२२.
९) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्र. रेशीम/कार्या-९/सि समग्र/निधी/B.D.S./उपलब्ध/ २१-२२/११०, दिनांक २४ जानेवारी, २०२२.

**प्रस्तावना : -**

केंद्र पुरस्कृत “सिल्क समग्र” योजनेंतर्गत सन २०१९-२० मधील सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थ्यांसाठी प्राप्त केंद्र हिस्सा ₹४७५.५४६ लक्ष पैकी ₹४२७.९९१ लक्ष व त्यास पूरक राज्य हिस्सा ₹२१४.००२ लक्ष असा एकूण ₹६४१.९९३ लक्ष निधी सदर योजनेकरिता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पीय तरतूदीतून वितरीत व खर्च करण्यास संदर्भाधीन दि.२२.०३.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. सदर निधीपैकी केंद्र हिस्सा ₹३०५.७५१८७ लक्ष व राज्य हिस्सा ₹१५२.८७६८ लक्ष असा एकूण ₹४५८.६२८६ लक्ष इतका खर्च झाला असून उर्वरित केंद्र हिस्सा ₹१२२.२३९१३ लक्ष व राज्य हिस्सा ₹६१.१२५२ लक्ष असा एकूण ₹१८३.३६४३३ लक्ष इतका अखर्चित निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर संचालक (रेशीम) यांनी समर्पित केला आहे. अशा प्रकारे सन २०१९-२० मधील सर्वसाधारण प्रवर्गातील

लाभार्थ्यांकरिता प्राप्त केंद्र हिस्सा ₹४७५.५४६ लक्ष इतक्या निधीपैकी अप्राप्त ₹४७.५५५ लक्ष (₹४७५.५४६-₹४२७.९९१ लक्ष) व संचालनालयाने समर्पित केलेला केंद्र हिस्सा ₹१२२.२३९१३ लक्ष असा एकूण केंद्र हिस्सा ₹१६९.७९४ लक्ष शासनाच्या एकत्रित निधीमध्ये जमा आहे. केंद्रीय रेशीम मंडळ, बंगळूरु यांनी राज्याकडे अखर्चित राहीलेला केंद्र हिस्सा सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात वापरण्यास त्यांचे संदर्भाधीन दि.१४.०७.२०२१ रोजीच्या पत्रान्वये मान्यता दिली आहे. त्याअनुषंगाने संचालक (रेशीम) यांनी केलेल्या विनंतीनुसार केंद्र पुरस्कृत सिल्क समग्र योजनेंतर्गत सन २०१९-२० मधील सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थ्यांसाठी अखर्चित राहीलेला केंद्र हिस्सा ₹१६९.७९४ व त्यास पूरक राज्य हिस्सा ₹८४.९०१ लक्ष असा एकूण ₹२५४.६९५ लक्ष इतका निधी सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

केंद्र पुरस्कृत सिल्क समग्र योजनेंतर्गत सन २०१९-२० मधील सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थ्यांसाठी प्राप्त निधीपैकी अखर्चित राहीलेला केंद्र हिस्सा ₹१६९.७९४ लक्ष व त्यास पूरक राज्य हिस्सा ₹८४.९०१ लक्ष असा एकूण ₹२५४.६९५ लक्ष इतका निधी पुढील तक्त्यात नमूद केलेल्या बाबींसाठी वितरीत व खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| अ. क्र. | योजनेचे नाव | युनिट कॉस्ट | लाभार्थी संख्या | केंद्र हिस्सा (५०%) | राज्य हिस्सा (२५%) | एकूण निधी *(५+६)* |
|---|---|---|---|---|---|---|
| *१* | *२* | *३* | *४* | *५* | *६* | *७* |
| १ | तुती लागवड विकास कार्यक्रमासाठी सहाय्य योजना | ०.५० | १६८ | ४१.८२० | २०.९१०० | ६२.७३०० |
| २ | किटक संगोपनगृह बांधणेसाठी सहायता योजना | १.६८६ | ७ | ५.९०२ | २.९५१२ | ८.८५३२० |
| ३ | स्वयंचलीत रिलींग युनिट (ARM) (४०० एन्ड) उभारणीस सहाय्य | १२२.०७२ | ०२ | १२२.०७२ | ६१.०४ | १८३.११२ |
| | | | **एकूण** | **१६९.७९४** | **८४.९०१** | **२५४.६९५** |

२. सदर निधी ISDS योजनेच्या सुधारीत मानकांना दिलेल्या प्रशासकीय मंजूरीनुसार व त्या संदर्भातील मार्गदर्शक सुचनांनुसार संचालक (रेशीम) यांनी खर्च करावा. तसेच, ज्या योजनांसाठी व बाबींसाठी केंद्र शासनाने निधी उपलब्ध केला आहे, त्याच बाबींवर सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. वितरीत करण्यात आलेल्या निधीतून झालेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्रीय रेशीम मंडळ व शासनास विहीत मुदतीत सादर करण्याची कार्यवाही संचालक (रेशीम) यांनी करावी.

**३.** सदर योजनेंतर्गत अनुदान देताना महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना, नानाजी देशमुख कृषि संजिवनी योजना प्रकल्प व इतर शासकीय योजनेंतर्गत लाभ दिला नसल्याची खात्री करुनच पात्र लाभार्थ्यांना अनुदान अदा करण्याची कार्यवाही संचालक (रेशीम) यांनी करावी.

४. सदर योजनेखाली केंद्र हिश्श्यासाठी ₹ १६९.७९४ लक्ष (अक्षरी रुपये एक कोटी एकोणसत्तर लक्ष एकोणऐंशी हजार चारशे फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यात येत असून उक्त खर्च हा "मागणी क्र.व्ही-२, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२) विविध सहकारी संस्थांना सहाय्य, (०२)(४९) रेशीम उद्योगाचा विकास (केंद्र पुरस्कृत) (केंद्र हिस्सा) (कार्यक्रम) (२८५११२६९), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)" अंतर्गत सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

तसेच, राज्य हिश्श्यासाठी ₹ ८४.९०१ लक्ष (अक्षरी रुपये चौऱ्यांशी लक्ष नव्वद हजार शंभर फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यात येत असून उक्त खर्च हा "मागणी क्र.व्ही-२, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२) विविध सहकारी संस्थांना सहाय्य, (०२)(४५) रेशीम उत्पादक, खादी ग्रामोद्योग व ग्रामोद्योग विकास (कार्यक्रम) (२८५११२०४), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)" अंतर्गत सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. उक्त निधी कोषागारातून आहरण व संवितरण करण्यासाठी संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर यांना नियंत्रण अधिकारी (V003) म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. उक्त निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर यांचे अधिनस्थ सुपूर्द करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.१५६/२०२२/व्यय-२, दिनांक ०९.०३.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०२२०३३०१९१४१५५५०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KISHOR DAULAT PATIL

Digitally signed by KISHOR DAULAT PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=800eadd0439866ccccf42ae63d94e1c7678124d2496cc90252be5707ed3de3f3, pseudonym=EC7EBA9942E9F48AE6C4CC1914098CEDF969D21E, serialNumber=4ACEBAE058F9790422D1385B04BAA7B606C3951CA0FDE91204ACE3BB2EE4B2C5, cn=KISHOR DAULAT PATIL
Date: 2022.03.30 19:15:16 +05'30'

**( किशोर पाटील )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३) संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर.
४) सदस्य-सचिव, केंद्रीय रेशीम मंडळ, बंगळूरु.
५) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
६) नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई.

७) वित्त विभाग (व्यय-२/अर्थसंकल्प-१३/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
८) अवर सचिव (का-१७ स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) सर्व प्रादेशिक रेशीम कार्यालये.
१०) सर्व जिल्हा रेशीम कार्यालये.
११) निवड नस्ती (रेशीम कक्ष).